**श्रीम. जुकटे अंजली विठ्ठलराव यांना गृह विभागाच्या अधिपत्याखालील महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवर सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब (राजपत्रित) या पदावर सरळसेवेने तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन आदेश क्र.एफएसएल-०४२३/प्र.क्र.३२३/पोल-४**

दुसरा मजला, मुख्य इमारत,

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक: १९ जुलै, २०२४

**संदर्भ :-** १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही- २०१८/व्ही.आय.पी.६७/ प्र.क्र.२०७/कार्या-१२/ दि. २८.०५.२०१८.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्र. एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि. १४.०७.२०२१.

३. उपसचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.:एचएमआर १६२२/प्र.क्र.११/ २०२२/अठ्ठावीस, दि. २४.०७.२०२३

४. गृह विभाग, शासन आदेश क्र. एफएसएल-०४२३/प्र.क्र.३२३/पोल-४, दि.१३.०३.२०२४

५. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्र.३१५२/२०२४ मधील दि.२१.०३.२०२४ रोजीचे आदेश.

६. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्र.६८९७/२०२४ मधील दि.१०.०७.२०२४ रोजीचे आदेश.

७. गृह विभाग, शासन आदेश क्र. एफएसएल-०४२३/प्र.क्र.३२३/पोल-४, दि.१३.०३.२०२४

<u>**प्रस्तावना**</u> :-

महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब (राजपत्रित) [सुधारित मॅट्रीक्समधील ७ व्या वेतन आयोगानुसार वेतनस्तर S-१५: ४१८००-१३२३००/-] या वेतनश्रेणीतील पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या उपरोक्त संदर्भ क्र. ३ येथील दि.२४.०७.२०२३ च्या पत्रान्वये एकूण ३३ उमेदवारांची त्यांच्या गुणवत्ता क्रमांकानुसार नियुक्तीसाठी शासनास शिफारस करण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने संदर्भ क्र.४ येथील शासन आदेशान्वये सदर ३३ पैकी ३१ उमेदवारांची न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयातील सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब (राजपत्रित) या पदावर सदर शासन निर्णयातील नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून सरळसेवेने तात्पुरती नियुक्ती देण्यात आली आहे. तद्नंतर संदर्भ क्र.७ येथील शासन आदेशान्वये श्री. हकीकुल्ला शहा (गु. क्र.५) यांना नियुक्ती देण्यात आली आहे. तथापि, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेले श्रीम. जुकटे अंजली विठ्ठलराव नियुक्ती देण्यात आली नव्हती. संदर्भ क्र.५ व संदर्भ क्र.६ येथील मा. उच्च न्यायालयाच्या दि.२१.०३.२०२४ व दि.१०.०७.२०२४ रोजीच्या "Responded number २ herein/Principal Secretary, Home Department, Mumbai, would issue a provisional probation appointment order to the Petitioner, within a period of १० days" या आदेशानुसार श्रीम. जुकटे अंजली विठ्ठलराव यांना सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात नियुक्ती देण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब (राजपत्रित) [सुधारित मॅट्रीक्समधील ७ व्या वेतन आयोगानुसार वेतनस्तर S-१५: ४१८००-१३२३००/-] या वेतनश्रेणीतील पदावर संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये शिफारस करण्यात आलेल्या खालील उमेदवारास त्याच्या नावापुढे दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी खालील नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात प्रयोगशाळानिहाय नियुक्ती देण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **गु. क्र.** | **उमेदवारांचे नाव** | **मूळ जात प्रवर्ग** | **म.लो.आयोगाने नियुक्तीसाठी शिफारस केलेला प्रवर्ग** | **पदस्थापनेच्या न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळेचे ठिकाण** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | ३३ | श्रीम. जुकटे अंजली विठ्ठलराव | अनुसूचित जमाती | अनुसूचित जमाती (महिला) | मुंबई |

सदरहू नियुक्ती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे :-

१) श्रीम. जुकटे अंजली विठ्ठलराव यांची सदरहू नियुक्ती मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्र.३१५२/२०२४ मधील २१.०३.२०२४ रोजी झालेले आदेश, रिट याचिका क्र.६८९७/२०२४ मधील दि.१०.०७.०२०२४ रोजी झालेले आदेश आणि मा. उच्च न्यायालयामध्ये दाखल अवमान याचिका क्र.४३३/२०२४ मधील आदेश तसेच याप्रकरणी मा. न्यायालयाकडून भविष्यात होणा-या आदेशाच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे.

२) श्रीम. जुकटे या नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून मा. उच्च न्यायालयाच्या निदेशाप्रमाणे विहीत मुदतीत वैध जातवैधता प्रमाणपत्र पडताळणी अहवाल शासनास सादर करतील. सदरहू कालावधीत अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समितीने श्रीम. जुकटे यांचे प्रमाणपत्र अवैध ठरविल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

३) उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२८.०५.२०१८ च्या शासन निर्णयातील सूचनेप्रमाणे संबंधित उमेदवारांनी सदर आदेश प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत पदस्थापनेच्या ठिकाणी रुजु होऊन अहवाल संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, विद्यानगरी, हंस भुग्रा मार्ग, कलिना, सांताक्रुझ (पू), मुंबई-४०००९८ यांच्याकडे पाठवावे.

४) सदर शासन आदेशामध्ये नमूद केलेल्या नियुक्तीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी उमेदवारांना प्रवासभत्ता अनुज्ञेय असणार नाही.

५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२२.०६.२०२१ मध्ये परिविक्षा धोरणाबाबत नमूद केलेल्या अटी व शर्ती सदर उमेदवारांना लागू राहतील.

६) उपरोक्त वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांना लागू असलेले अन्य सेवाविषयक नियम सदर उमेदवारांना लागू होतील.

७) सदर उमेदवारांची पदस्थापना या शासन निर्णयात दर्शविण्यात आलेल्या ठिकाणीच करण्यात येईल, उमेदवारांची ओळख पटविण्यासाठी छायाचित्र असलेले आधारकार्ड, मोटार ड्रायव्हिंग

लायसन्स अथवा अन्य वैध प्रमाणपत्रे यापैकी एकाच्या आधारे रुजू करुन घेण्याबाबतची दक्षता संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी घ्यावी.

८) अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समितीच्या अंतिम निकालानंतर श्रीम. जुकटे अंजली विठ्ठलराव यांच्या नियुक्तीबाबत पुढील आदेश निर्गमित करण्यात येतील.

**२.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र.२०२४०७१९१७४२१२५८२९ असा आहे. सदर शासन आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

BHIKAN ONKAR THAKUR

Digitally signed by BHIKAN ONKAR THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=cb64a92ffb1a1fc675b87b99d133c8e4ffed848f8ec9727d5082eb07dbbe3343, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2CF77A3A2916BE200D3D9A0961DF4F9F77CC14E167C7FCEC2EA903E779A2239A, cn=BHIKAN ONKAR THAKUR
Date: 2024.07.22 11:57:23 +05'30'

**( भिकन ठाकूर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महासंचालक (न्यायिक व तांत्रिक),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राद्वारे)
३. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय,मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
५. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. उपसंचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा,पुणे/कोल्हापूर/नाशिक/औरंगाबाद/नांदेड/नागपूर/अमरावती.
७. उपसंचालक, लघु न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा ठाणे/रत्नागिरी/सोलापूर/धुळे/चंद्रपूर.
८. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.
९. अधिदान व लेखा अधिकारी/निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/रत्नागिरी/सोलापूर/धुळे/चंद्रपूर/ पुणे/कोल्हापूर/ नाशिक/ औरंगाबाद/ नांदेड/नागपूर/अमरावती.
११. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या-१२/कार्या-१६ब),मंत्रालय,मुंबई.
१२. सर्व संबंधित उमेदवार यांना,
(संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय,मुंबई यांचे मार्फत)
१३. निवडनस्ती , गृह विभाग/पोल-४